# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक–दुरुस्ती-०७१७/प्र.क्र.४३८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २४ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- पोलीस वसाहत, पाथर्डी फाटा, तालुका-नाशिक, जिल्हा-नाशिक, येथील निवासी इमारतींची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक १७.०७.२०१७.

**ज्ञापन.**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस वसाहत, पाथर्डी फाटा, तालुका-नाशिक, जिल्हा-नाशिक, येथील निवासी इमारतींची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, सहायक अभियंता, श्रेणी-१, दक्षिण (सार्वजनिक बांधकाम) नाशिक, यांनी सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीनुसार तयार केलेले रु.४,४४,३४,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज हे (१) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक, (२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नाशिक, आणि (३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, नाशिक, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.४,८२,४२,५३७/-** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस वसाहत, पाथर्डी फाटा, तालुका-नाशिक, जिल्हा-नाशिक, येथील निवासी इमारतींची दुरुस्ती करण्यासाठी **रु.४,८२,४२,५३७/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

**अटी.**

१) खर्चाचे अंदाज पोलीस आयुक्त, नाशिक शहर, यांनी साक्षांकित करावे.
२) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करू नये.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (अनिवार्य) (*दत्तमत*) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे शासकीय ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६२३/इमा-२, दिनांक २९.०७.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८२४१७१०४७२१२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.24 16:59:50 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, नाशिक शहर.

**प्रत :-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, नाशिक *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दुरुस्त केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नाशिक *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दुरुस्त केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दुरुस्त केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).